**श्री क्षेत्र पंढरपुर येथे आषाढी वारी-२०२४ करीता महाआरोग्य शिबिराचे आयोजनासाठी होणा-या अंदाजित खर्चास "खास बाब" म्हणून प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय, क्रमांकः प्रशामा २०२४/प्र.क्र.२१६/आरोग्य ३अ**
१० वा मजला, संकुल इमारत,
जी.टी. रुग्णालय आवार, मुंबई - ४०० ००१.
दिनांक : १३ जून, २०२४.

**वाचा :- सह**संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्रमांक- आसेआ/कक्ष-३/टे-४/नस्ती क्र.१०१४०२/आषाढी वारी २०२४/१७७०६-११/निधी व प्र.मा./२०२३, दिनांक २८.०५.२०२४

**प्रस्तावना:-**

श्री क्षेत्र पंढरपुर येथे वर्षातून चार एकादशीनिमित्त राज्यातून तसेच परराज्यातून येणा-या भाविकांना तातडीच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याकरीता महाआरोग्य शिबिराचे (२४x७) आयोजन करण्यात येणार आहे. त्यानुसार पंढरपूर येथे आषाढी वारी-२०२४ करीता पंढरपूर येथील आषाढी वारीची ठिकाणे व मार्गांवर १५ ठिकाणी तात्पुरते दवाखाने, १७ ठिकाणी उपचार केंद्रे व ३ ठिकाणी महाआरोग्य शिबिराचे आयोजन करण्याचे प्रस्तावित आहे. त्याकरीता आवश्यक असलेली विसृत जागा व अनुषंगिक बाबी, तसेच वारी व भाविकांच्या आरोग्य सेवेसाठी उपलब्ध करुन देण्यात येणारा मनुष्यबळ, (डॉक्टर, विशेषज्ञ, निमवैद्यकीय अधिकारी/कर्मचारी, आदी) व्यवस्थेसाठी, रुग्णवाहीका, औषध व साहित्य सामुग्रीच्या दृष्टीने होणा-या अंदाजित खर्चास "खास बाब" म्हणून प्रसासकीय मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय:-**

पंढरपुर येथे आषाढी वारी २०२४ करीता महाआरोग्य शिबिराच्या नियोजनाच्या दृष्टीने खालील तक्त्यात नमूद बाबींकरीता अंदाजित एकूण रु.९४४.०० लक्ष (अक्षरी रु.नऊ कोटी चव्वेचाळीस लक्ष फ़क्त) इतक्या रकमेस पुढील प्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | महाआरोग्य शिबिर नियोजनाची बाब | अंदाजित खर्च | बाब |
|---|---|---|---|
| १ | मंडप व त्याकरीता आवश्यक बाबींवरील खर्च | रु. ९०.०० लक्ष | १३-कार्यालयीन खर्च |
| २ | बैठक व्यवस्था, फ़र्निचर, टेबल व खुर्ची भाडे आदी खर्च | रु. १२.०० लक्ष | |
| ३ | स्वच्छतागृहांची व्यवस्था- मोबाईल टॉयलेट ब्लॉक आदी | रु. १५.०० लक्ष | |
| ४ | डॉक्टर, नर्सेस व इतर कर्मचा-यांकरीता अल्पोपहार व भोजनव्यवस्था | रु. ३००.०० लक्ष | |

| | | | |
|---|---|---|---|
| ५ | आरोग्य शिबिराकरीता जागा भाडे खर्च | रु. ६.०० लक्ष | |
| ६ | सी.सी.टी.व्ही. व डिजिटल स्क्रिन व्यवस्था उभारणे | रु. १५.०० लक्ष | |
| ७ | निवासव्यवस्था खर्च | रु. १८०.०० लक्ष | |
| ८ | १७ ठिकाणी उपचार केंद्राच्या भौतिक साहित्य, सुविधा इ. | रु. २०.०० लक्ष | |
| ९ | शिबिरासाठी आकस्मिक खर्च, केसपेपर, कार्डस, इंटरनेट, वॉकी-टॉकी इ. | रु. ३५.०० लक्ष | |
| १० | वीज कनेक्शन व वीज बिल | रु. ६.०० लक्ष | |
| ११ | वाहतुक व्यवस्था व इंधन खर्च | रु. १५.०० लक्ष | |
| १२ | आरोग्य दूत इंधन खर्च | रु.१०.०० लक्ष | |
| १३ | औषधे व औषधी साहित्य सामुग्री खरेदी | रु. २४०.०० लक्ष | २१-पुरवठा व सामग्री |
| | **एकूण अंदाजित खर्च** | **रु.९४४.०० लक्ष** | |

२. अटी व शर्ती :-

१) सदर सेवेसाठी शासन निर्णय, उदयोग, उर्जा व कामगार विभाग, क्रमांक भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग III/उदयोग-४, दि.०१.१२.२०१६ अन्वये प्रसिध्द केलेल्या सुधारीत नियमपुस्तिकेत विहित केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

२) खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश ( Technical Specification) संबंधित तज्ज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच सदर तांत्रिक विनिर्देशक कोणत्याही पुरवठादारास फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच त्याबाबींची खरेदी करण्यात यावी.

३) निविदा प्रक्रिया राबवितांना केंद्रीय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelince) तंतोतंत पालन करण्यात यावे.

४) मुख्य प्रशासकीय अधिकारी, उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे परिमंडळ, पुणे यांना आहरण संवितरण अधिकारी व उपसंचालक, आरोग्य सेवा परिमंडळ, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच निविदा प्रक्रिया उपसंचालक स्तरावर पूर्ण करुन पुरवठा आदेश उपसंचालक स्तरावरुन खरेदी समितीच्या मान्यतेने निर्गमित करण्यात यावेत.

५) प्रशासकीय मान्यता देताना प्रक्रियेअंतीम निश्चित करण्यात आलेला दर हा बाजारभावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधीत पुरवठादाराने या बाबींचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

३. उपरोक्त बाबीकरीता होणारा खर्च खालील लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ मधील मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक आर-१
२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य
०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा
सांकेतांक क्रमांक (२२१० ०१४६)
१३- कार्यालयीन खर्च
२१-साधन व सामग्री

४. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम भाग-२, दि.१७.४.२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका,१९७८,भाग पहिला, उपविभाग-दोन मधील अ.क्र.४,नियम क्र.७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

५. सदर शासन शुद्धिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१३११३३४६२०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARVIND BHIMRAO MORE

Digitally signed by ARVIND BHIMRAO MORE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=203af2dfba7db2a4824298a34f2c9294f93396f53d7f87cd4d69fecf5cf7005f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9246B8CCD2E2CB10707678D45EA1AD26CC1E4D7BFF7BD2AA1F253A716B8C448B, cn=ARVIND BHIMRAO MORE
Date: 2024.06.13 15:44:23 +05'30'

**(अ. भि. मोरे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता), १ / २, महाराष्ट्र मुंबई/ नागपूर.
२. आयुक्त आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३. संचालक (१), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
४. सह संचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये राज्यस्तर), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, सोलापूर.
७. जिल्हा आरोग्य अधिकारी, जि.प. सोलापूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे / सोलापूर.

९. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती (कार्यासन आरोग्य-३अ).